**अतिमहत्वाच्या व्यक्तींच्या हवाई प्रवासाकरीता एजन्सी नियुक्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः विचासं १११४/ प्र.क्र.४७/ २८-अ**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय, मुंबई ३२.

तारीख: २८ नोव्हेंबर, २०१४

वाचा —

१) **शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग क्र.एव्हीएन-१००८/प्र.क्र.६२१/२८-अ, दि.३०.०८.२००८.**

२) **विमानचालन संचालनालयाशी संबंधित मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालीलशक्ती प्रदत्त समितीच्या दि.१८.१०.२०१४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.**

प्रस्तावना —

राज्यातील अतिमहत्वाच्या व्यक्तींच्या हवाई प्रवासाची जबाबदारी राज्य शासनाच्या अधिनस्त विमानचालन संचालनालयाद्वारे पार पाडली जात असुन काही कारणाने शासकीय विमान / हेलिकॉप्टर उपलब्ध नसल्यास सार्वजनिक क्षेत्रातील एव्हीएशन एजन्सीद्वारे विमान / हेलिकॉप्टर भाड्याने उपलब्ध करुन घेतले जाते. अतिमहत्वाच्या व्यक्तींचे हवाई प्रवास अचानक निश्चित होत असल्यामुळे भाड्याने विमान / हेलिकॉप्टर उपलब्ध करण्याकरीता सार्वजनिक क्षेत्रातील एव्हीएशन एजन्सीची नियुक्ती व हवाई सेवेचे दर निश्चित करण्याकरीता जाहिर निविदा पध्दतीचा अवलंब करण्यात आला होता.

२. राज्य शासनाच्या अधिनस्त विमानचालन संचालनालयाच्या कामकाजाशी संबंधित बाबींसंदर्भात निर्णय घेण्यासाठी संदर्भ क्र.१ अन्वये स्थापन करण्यात आलेल्या शक्ती प्रदत्त समितीची बैठक मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.१८.१०.२०१४ रोजी संपन्न झाली. या बैठकीत राज्यातील अतिमहत्वाच्या व्यक्तींच्या हवाई प्रवासाकरीता एजन्सी निश्चित करण्याबाबतचा प्रस्ताव सादर करण्यात आला होता. त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे ;

**शासन निर्णय—**

अतिमहत्वाच्या व्यक्तींच्या हवाई प्रवासाबाबत एजन्सी नियुक्त करण्याबाबत प्राप्त झालेल्या ई-निविदांमधून ॲडॉनिस एव्हीएशन व ॲरो एअरक्राफ्ट चार्टर्स या कंपन्यांनी सादर केलेल्या निविदा स्विकारण्यात आल्या असून या कंपन्यांसोबत राज्य शासनाच्या वतीने करारनामे करण्याचे अधिकार संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू यांना प्रदान करण्यात येत आहेत. कराराचा कालावधी प्रथम

दोन वर्षांचा असावा व करारात, करार कालावधी त्याच अटी व शर्तींवर आणखी एका वर्षाने वाढविण्याची तरतूद असावी.

२. या प्रित्यर्थचा खर्च क्र.ए-४, २०७० इतर प्रशासकीय सेवा (११४) परिवहन साधनांची खरेदी व परिरक्षण (००) (०२) शासनाचे विमानचालन विषयक सल्लागार या लेखाशिर्षांतर्गत ५०-इतर खर्च या उद्दिष्टाखाली संबंधित आर्थिक वर्षात उपलब्ध अर्थसंकल्प तरतूदीतून भागाविण्यात यावा, व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय राज्य शासनाच्या अधिनस्त विमानचालन संचालनालयाच्या कामाकाजाशी संबंधित बाबींसंदर्भात निर्णय घेण्यासाठी संदर्भ क्र.१ अन्वये स्थापन करण्यात आलेल्या शक्ती प्रदत्त समितीच्या दि.१८.१०.२०१४ रोजी झालेल्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४११२८१५३४३६८४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAMEER ANANT SAWANT

Digitally signed by SAMEER ANANT SAWANT
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SAMEER ANANT SAWANT
Date: 2014.11.28 17:19:33 +05'30'

**( समीर सावंत )**

कार्यासन अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२. अपर मुख्य सचिव (विमान चालन), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
३. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
४. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
५. प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग , मंत्रालय, मुंबई ३२.
६. प्रधान सचिव (उद्योग), उद्योग उर्जा व कामगार विभाग , मंत्रालय, मुंबई ३२.

७. प्रधान सचिव, मा.मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई ३२
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ.
९. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी
१०. संचालक, विमानचालन संचालनालय, जुहू विमानतळ, मुंबई ५६.
११. महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२. महालेखापाल, ( लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३. उप सचिव, (मुख्य सचिव यांचे कार्यालय), मंत्रालय, मुंबई ३२.
१४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१५. निवड नस्ती.